**<u>मंत्रालयात अभ्यागतांना प्रवेश देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : पीईएस १११६/ प्र.क्र. ५२८/विशा-४.**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ एप्रिल, २०१७

**<u>वाचा:</u>** १) गृह विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: पीईएस १०१०/प्र.क्र.८१२/विशा-४, दि.१.१.२०११
२) गृह विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: पीईएस १११६/प्र.क्र.५२८/विशा-४, दि.२८.११.२०१६

**<u>परिपत्रक</u> :-**

मंत्रालयातील अंतर्गत सुरक्षा आणि कामकाज या बाबी विचारात घेऊन मंत्रालयात येणाऱ्या अभ्यांगतांना प्रवेशपत्र देण्यासाठी संदर्भातील अ.क्र. २ येथील दि.२८.११.२०१६ च्या परिपत्रकाद्वारे मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सध्या मा.मंत्री/राज्यमंत्री यांच्या कार्यालयात येणाऱ्या अभ्यागतांना खाजगी सचिव यांच्या स्वाक्षरीने आणि प्रशासकीय विभागात येणाऱ्या अभ्यागतांना त्या विभागातील उप सचिव (आस्थापना) यांच्या स्वाक्षरीने गृह विभाग विशा-४ या कार्यासनामार्फत सुरक्षा यंत्रणेस पत्र पाठविण्याबाबत कळविण्यात आले आहे. या कार्यपध्दतीमुळे अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेश करण्यास विलंब होत आहे. त्यामुळे मा.मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांच्या कार्यालयात तसेच प्रशासकीय विभागांमध्ये बैठकीकरिता व कामकाजाकरिता येणाऱ्या अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेशपत्र देण्याबाबत आता खालीलप्रमाणे कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे.

२. मंत्रालयात येणाऱ्या अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेश मिळण्यासाठी मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील खाजगी सचिवांच्या स्वाक्षरीने, अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव यांच्या कार्यालयातील स्वीय सहायकांच्या स्वाक्षरीने आणि प्रशासकीय विभागातील उप सचिव (आस्थापना) यांच्या स्वाक्षरीने अभ्यागताचे पूर्ण नाव, प्रवेशाचा दिनांक व वेळ नमूद करुन पोलीस उप आयुक्त, मंत्रालय सुरक्षा कक्ष, तळ मजला, मुख्य इमारत, मंत्रालय येथे पत्र देण्यात यावे.

३. सदर पत्र मंत्रालय सुरक्षा कक्षात प्राप्त झाल्यावर त्यांनी सदर पत्र तपासून ते मंत्रालयातील प्रवेशद्वारावर पाठवून संबंधित अधिकारी/कर्मचारी/अभ्यागत याचे ओळखपत्र व सुरक्षा तपासणीकरुन त्यांना मंत्रालयात प्रवेश देण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०४२४१७३०४८५४२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash Ganpat Deshmukh

Digitally signed by Prakash Ganpat Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a2023a0ab760cd894a2dbe530b17c6d82f1bdc0c3543072e60d70efe328c9bc2, serialNumber=aa75bd353f4df463119a0887b43c329c3364a4d90afd1a5f153d6604ab536ddb, cn=Prakash Ganpat Deshmukh
Date: 2017.04.24 17:32:40 +05'30'

**( प्र.ग.देशमुख )**
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति -**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व सह सचिव/उप सचिव (आस्थापना), प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
११.पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.